**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या अधिपत्याखालील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०१९/प्र.क्र.७१/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. १० ऑक्टोबर, २०१९

<u>संदर्भ</u> : १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०१९/प्र.क्र.११/प्रशासन-१ दि. २८ फेब्रुवारी, २०१९
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. ११ सप्टेंबर, २०१९
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे दि. १७ सप्टेंबर, २०१९ रोजीचे पत्र.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक यांचे दि. १६ सप्टेंबर, २०१९ रोजीचे पत्र.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव यांचे दि. ५ सप्टेंबर, २०१९ रोजीचे पत्र.
६) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे यांचे दि. ९ सप्टेंबर, २०१९ रोजीचे पत्र.
७) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर यांचे दि. ३ ऑक्टोबर, २०१९ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव; अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर यांच्याकडील अस्थायी पदे दि. १ मार्च, २०१९ ते ३० सप्टेंबर, २०१९ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक; अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव; अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर यांच्या अधिपत्याखालील पुढील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे, रुपांतरित अस्थायी आस्थापनेवरील पदे, जिल्हा परिषद अस्थायी आस्थापनेवरील पदे सहा महिन्यापेक्षा

जास्त काळ रिक्त नाहीत या अटीच्या अधीन राहून दिनांक **१ ऑक्टोबर, २०१९** पासून दिनांक **२९ फेब्रुवारी, २०२०** पर्यन्त चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

| **कार्यालयाचे नाव** | **नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे** | **जिल्हा परिषद आस्थापनेवरील पदे** | **रूपांतरित अस्थायी आस्थापनेवरील पदे** |
|---|---|---|---|
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक | ६ | ० | ० |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक | १०३३ | १७४ | २५७ |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव | ६६६ | २० | १५५ |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे | ७४७ | १२५ | १७४ |
| अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर | ९४७ | १४ | ३३३ |

३. दि. २५ नोव्हेंबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत स्थापत्य शाखेतील क्षेत्रिय स्तरावरील नियमित संवर्गापैकी ३४ संवर्गातील पदांचा आणि दि. २२फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये उर्वरित ३५ पासून पुढील संवर्गातील पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. या शासन निर्णयातील तरतूदी/सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. या बाबीवरील खर्च मंडळ कार्यालयातील पदांसाठी २०५९-सार्वजनिक बांधकामे ८०- सर्वसाधारण, ००१- संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर) व विभाग/ उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०- सर्वसाधारण - ००१-संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर) लेखाशिर्षाखालील सन २०१९-२०२० या चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. ११ सप्टेंबर, २०१९ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०१११२०७५३७६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nisha Manohar Mahajan

Digitally signed by Nisha Manohar Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a9f1749dec86c69520dc99c8a73d64e830153ee031b1b93c743e21a94cd3e93, serialNumber=78a137191efea41da17c39ba5785218ceb91615a2fe9adace7540ad0ac40f348, cn=Nisha Manohar Mahajan
Date: 2019.10.11 12:09:15 +05'30'

**( नि. म. महाजन )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत**-१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३.महालेखापाल२- (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४.महालेखापाल२- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५.वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
६.वित्त विभाग (वित्तिय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.
७.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक
८.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगाव
१०.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे
११. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर
१२.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यकारी अभियंते
१३.संबंधित कोषागार / उप कोषागार अधिकारी
१४.कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कार्यासन अधिकारी, प्रशासन१-, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. (निवडनस्ती)